पीसीपीएनडीटी अंतर्गत "मुलींच्या जन्माचे महत्व" विषयी जनजागृती उपक्रमास सन २०१७-१८ साठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय, क्रमांकः आयईसी २०१७/प्र.क्र.१८५ /आरोग्य ३

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २८ ऑगस्ट, २०१७.

वाचा :

१) आयुक्त,आरोग्य सेवा संचालनालय,मुंबई यांचे पत्र क्रमांक- राआसो/आरसीएच/IEC /प्रस्ताव/२२५१८-१९/१७, दि.०६.०६.२०१७.

२) राज्य आरोग्य शिक्षण व संपर्कविभाग, पुणे यांचे पत्र क्रमांक- उपसंआसे/राआशिवसंवि/ प्रसिध्दी /पीसीपीएनडीटी/२८८७-८८/१७, दिनांक १९.०७.२०१७.

## शासन निर्णय:

पीसीपीएनडीटी अंतर्गत मुलीच्या जन्माचे महत्वविषयी जनजागृती जनजागृती करण्यासाठी सन २०१७-१८ या वर्षात राबविण्यात येणा-या खाली नमूद जनजागृतीविषयक उपक्रमास आणि त्यासाठी आवश्यक अनुदान खर्च करण्यास त्याखाली नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून याव्दारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | उपक्रम | तपशिल | अपेक्षित खर्च (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | ग्रामीण भागात गावोगावी जाणा-या परिवहन महामंडळाच्या सर्वसाधारण प्रवासी एस.टी.बसमध्ये प्रत्येक आसनाच्या मागे मुलीच्या जन्माचे | एस.टी.बसमध्ये २/३ शीटच्या आसनाच्या पाठीमागे ३०० मी.मी.x ६०० मी.मी. व ५०० मी.मी.x ६०० मी.मी.आकाराचे संदेश प्रदर्शीत करणे. (एका बसवर एक महिण्यासाठी संदेश प्रसिध्द करण्याचा खर्च प्रती | १९,८२,५१८ |

| | | | |
|---|---|---|---|
| | महत्वविषयी संदेश प्रदर्शित करुन जनजागृती करणे | बस ३८ आसनप्रमाणे)<br>प्रदर्शन भाडे रु.५४००/-<br>+ प्रिंटींग चार्जेस- २८५०/- (प्रती सीट रु.७५/-)<br>+संदेश फिक्सींग चार्जेस रु.७६००(प्रती सीट रु.२००/)<br>------------------------------------------<br>एकूण रु. १५८५०/-<br>+१८% जीएसटी = २८५३<br>--------------------------------------<br>एकूण सर्व रु. १८७०३/-<br>याप्रमाणे एकूण १०६ बसेसवर संदेश प्रदर्शित करणे. सदर काम एसटी बसेसमध्ये सीटच्या मागे संदेश प्रदर्शीत करण्यासाठी नियुक्त मे.ओम ॲडव्हर्टायझींग,मुंबई या sole right संस्थेकडून त्याचेकडील दरानुसार करुन घेण्यात येईल | |

<u>२.अटी व शर्ती</u>-:

१. सदर खरेदीसाठी शासन निर्णय, उदयोग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/ भाग III/उदयोग-४, दि.०१.१२.२०१६ अन्वये प्रसिध्द केलेल्या सुधारीत नियमपुस्तिकेत विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा. एकलस्त्रोत खरेदीबाबत सदर शासन निर्णयामधील “शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका” यात नमूद परिच्छेद क्रमांक ३.२.३ येथील तरतुदीनुसार तसेच विहित कार्यपध्दतीस अनुसरुन करण्यात यावी.

२. खरेदी करावाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical Specification) संबंधीत तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी) मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच सदर तांत्रिक विनिर्देश के कोणत्याही कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच त्याबाबींची खरेदी करण्यात यावी.

३. प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत.त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती निश्चित करण्यात आलेला दर हा बाजारभावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधीत पुरवठादाराने या बाबींचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

४. खरेदी करण्यात येणा-या बाबींची पुरवठापुर्व /पुरवठयानंतर नमुना तपासणी (Pre/post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विर्निदेश असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात यावी.

५. खरेदी करण्यात येणा-या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (Storage and Distribution) करणे तसेच पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply Chain management) व वस्तुसुची व्यवस्थापन (inventary Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहित मुदतीत वापर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

६. सदर खरेदीची व्दिरुक्ती (Duplication) होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

७) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबवितांना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelince) तंतोतंत पालन करण्यात यावे.

८. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२,दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्र.७ समोरील स्तंभ क्रमांक ६ मधील अटींची पूर्तता करण्यात यावी.

९. खरेदी प्रक्रिया पुर्ण झाल्यानंतर केंद्रीय खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमीत करण्यात यावेत.

३. वर नमूद उपक्रमांसाठीचा खर्च आयईसी पीआयपी सन २०१६-१७ मधील B १०.३.५.२ या FMR Code खाली मंजूर असलेल्या व सन २०१७-१८ या वर्षात **Committed Expenditure** म्हणून ठेवण्यात आलेल्या रु.२०.०० लाख या निधीमधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२,दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार

नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्र.७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसारनिर्गमीत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८२८१२१६०२२८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.08.28 15:52:08 +05'30'

**( रो.दि.कदम पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल- १ / २, महाराष्ट्र, (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक, राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सहसंचालक, (अर्थ व प्रशासन)आरोग्य सेवा, मुंबई.
५. उप संचालक, आरोग्य सेवा, राज्य आरोग्य शिक्षण व संपर्क विभाग, पुणे.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
७. वित्त विभाग (कोषागारे/ प्रशासन ५), मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती (कार्यासन आरोग्य-३).